महाराष्ट्र राज्य हज समितीच्या आस्थापनेवरील
कर्मचाऱ्यांच्या सेवा नियमित करणेबाबत..

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः हज २०१५/प्र.क्र.३६७/का-५

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: २९.०७.२०१७

**वाचा -**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीआर-२/९०/अ.क, दि.२९.०१.१९९०.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.हज-१०९०/३/सीआर-३/अ.क्र, दि.५.९.१९९०.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः हज-१०९४/१२४४/३५, दि.२८.९.२०००.
४) शासन पत्र सामान्य प्रशासन विभाग-आढावा-१०९९/२२०/३५, दि.६.११.२०००.
५) हज समिती अधिनियम, २००२.
६) महाराष्ट्र राज्य हज समिती नियम, २००९.

**प्रस्तावना -**

राज्यातील हज यात्रेसाठी जाणाऱ्या हज यात्रेकरुंच्या सोयीसाठी राज्य हज समिती स्थापन करण्याचा राज्य शासनाने दि.२९.१२.१९८९ रोजी निर्णय घेतला. त्यानुसार उपरोक्त अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राज्य हज समितीची स्थापना करण्यात आली. तद्नंतर, राज्य हज समितीला सहाय्य करण्यासाठी व समितीचे नियमित कामकाज पार पाडण्यासाठी उपरोक्त अ.क्र.२ येथील पत्रान्वये राज्य हज समिती कार्यालया करिता अधिक्षक, सहाय्यक, लघुलेखक, लिपिक, लेखा-लिपिक व शिपाई ही पदे निर्माण करण्यास शासनाने मंजुरी दिली असून वरील अ.क्र.(३) येथील शासन निर्णयान्वये राज्य हज समितीच्या आस्थापनेवरील उपरोक्त पदांचे सेवाप्रवेश नियम विहित करण्यात आले आहेत.

महाराष्ट्र राज्य हज समितीच्या आस्थापनेवर विविध आदेशान्वये खालील कर्मचाऱ्यांची नियुक्ती करण्यात आली आहे.

| अ.क्र. | कर्मचाऱ्यांचे नाव | पदनाम व वेतनश्रेणी | आदेशाचा क्रमांक व दिनांक | प्रथम नियुक्तीचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.मोहम्मद वसीम इक्बाल हुसेन | सहाय्यक (रु.१४००-४०-१६००-५०-२२००-द.रो.-६०-२६००) | क्र.एमएसएचसी/इएसटी/१, दि.०१.१२.१९९० | दि.०८/०९/१९९० |
| २ | श्री.मोहम्मद शकील शमीम अहमद | लिपिक (रु.९५०-२०-११५०-द.रो.-२५-१५००) | क्र.एमएसएचसी/३एसटी/२, दि.१/१२/१९९० | १०/०९/१९९० |
| ३ | श्री.मोहम्मद सादिक मोहम्मद हनिफ | लघुटंकलेखक (१२००-३०-१४६०-द.रो.४०-२०४०) | क्र.एमएसएचसी/३एसटी/४, दि.३०/१०/१९९० | ०१/११/१९९१ |
| ४ | श्री.जुबेर अहमद मुख्तार अहमद | लेखालिपीक (रु.९५०-२०-११५०-द.रो.-२५-१५००) | क्र.एमएसएचसी/४८५२, दि.१७/०५/१९९५ | ०१/०५/१९९५ |
| ५ | श्री.इस्माईल मुसा शेख | शिपाई (रु.७५०-१२-८७०-द.रो.१४-९५०) | क्र.एमएसएचसी/४३२४, दि.१३/०९/१९९४ | १२/०९/१९९४ |

महाराष्ट्र राज्य हज समिती नियम, २००९ च्या नियम (१२) व (१३) मधील तरतुदींच्या अनुषंगाने, महाराष्ट्र राज्य हज समितीवर नियुक्त करण्यात आलेल्या उपरोक्त कर्मचाऱ्यांच्या सेवा नियमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

महाराष्ट्र राज्य हज समिती नियम, २००९ मधील नियम क्र.१२ व १३ येथील तरतुदीनुसार महाराष्ट्र राज्य हज समितीवर कार्यरत असलेल्या उपरोक्त ५ कर्मचाऱ्यांच्या सेवा त्यांच्या प्रथम नियुक्तीच्या दिनांकापासून नियमित करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे. महाराष्ट्र राज्य हज समिती नियम, २००९ मधील तरतुदीनुसार अनुज्ञेय असलेले सेवाविषयक लाभ या कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय असतील.

हे आदेश सामान्य प्रशासन विभाग व विधी व न्याय विभागाच्या सहमतीने त्यांचे अनौपचारिक संदर्भ अनुक्रमे क्र.३३८/२०१६, साप्रवि/१२, दि.०९/०३/२०१६ व क्र.४४०/ सिव्हील/ कॉनफ्ली/ २०१३/ ए-ब्रँच, दि.२३/१२/२०१६ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७२९१७२१०६९३१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anees Iqbal Ismail Shaikh

Digitally signed by Anees Iqbal Ismail Shaikh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b87d4d4fe12b58aa774e6d5a46d4e107c68149390bcfbc86a5293668bb39aa80, cn=Anees Iqbal Ismail Shaikh
Date: 2017.08.01 12:04:49 +05'30'

**( अनिस शेख )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई
२. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
४. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
५. खाजगी सचिव, मा.मंत्री, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. खाजगी सचिव, मा.राज्यमंत्री, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. स्वीय सहाय्यक, प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. स्वीय सहाय्यक, सह सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. सर्व अधिकारी, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.निवड नस्ती/कार्यासन-५, संग्रहार्थ.